**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः कअनि-११२३/प्र.क्र.२३/१४-ब**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२३

## आदेश

श्री. गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी, वित्त विभाग यांची नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील बोदवड नगर पंचायत, जि.जळगाव या कार्यालयातील "मुख्याधिकारी" या पदावर प्रथमत: २ वर्षासाठी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

अ) श्री. गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल, त्यानंतर २ वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सूपूर्द करुन ते त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा.....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन व तीन ) मधील तरतुदी विचारात घेऊन वित्त विभाग व नगर विकास विभाग यांनी श्री.गजानन ह. तायडे यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती ठरवाव्यात.

३. श्री. गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी वित्त विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री.गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी यांना प्रतिनियुक्तीवरील नियुक्ती स्वीकारण्यासाठी वित्त विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१३१५४४४८६८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.03.13 15:49:20 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा)सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) मुख्याधिकारी, बोदवड नगर पंचायत, जि.जळगाव
४) उप सचिव(नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सह/उप सचिव (आस्थापना), वित्त विभाग - त्यांना विनंती करण्यात येते की, प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.
६) श्री. गजानन ह. तायडे, कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई (प्रशासकीय विभागामार्फत)
७) निवड नस्ती/संग्रहार्थ (का.१४ब).